**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे एरोनॉटिकल स्ट्रक्चर आणि इक्विपमेंट फिटर (Aeronautical Structure and Equipment Fitter) हा व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०२३/प्र.क्र. ४६/व्यशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२३

**संदर्भ :-** १) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक:आयटीआय-२०१९/प्र.क्र.१३८/व्यशि-३ दिनांक : २०.०९.२०१९
२) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-१ दिनांक- ०७.०४.२०२२
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.०७/सीटीएस/AS&EF/२०२३/७६ दिनांक : ०३.०२.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना :-**

देशात जागतिक दर्जाचे प्रशिक्षण आणि शैक्षणिक उपक्रम विकसित करण्यासाठी कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, भारत सरकार व Dassault Skill Academy, France यांच्या दरम्यान दि.०३ जुलै, २०१९ रोजी सामंजस्य करार करण्यात आलेला असून सदर करारानुसार औद्योगिक प्रशिक्षण संस्था नागपूर येथे ऑगस्ट २०१९ या प्रवेशसत्रापासून Aeronautical Structure and Equipment Fitter ह्या व्यवसाय अभ्यासक्रमांच्या ३ तुकड्या सुरू करण्यासाठी दि.२०/०९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर पुणे व नाशिक जिल्ह्यात गरजू विद्यार्थ्यांचे कौशल्य विकसित करुन रोजगार निर्मिती करण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमाच्या तुकड्या सुरु करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे जि. पुणे व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक जि. नाशिक येथे Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमाच्या प्रत्येकी २ नवीन तुकड्या सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तावीत व्यवसाय अभ्यासक्रमाचा, हत्यारे व यंत्रसामुग्रीच्या खर्चाचा तपशील सोबतच्या “प्रपत्र १ व २” मध्ये देण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र. २ येथील विभागाच्या शासन निर्णय दि.०७/०४/२०२२ च्या सुधारित आकृतीबंधानुसार शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुल, कुही, नरखेड व गोंडपिंपरी येथील

प्रत्येकी ०१ शिल्पनिदेशक पद (एकुण ०४ शिल्पनिदेशक पदे) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक या संस्थांसाठी Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमाच्या प्रत्येकी २ तुकड्यांसाठी असे शिल्पनिदेशकाची एकुण ०४ पदे स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांचे वेतनश्रेणीचा तपशिल सोबतच्या प्रपत्र ३ मध्ये देण्यात येत आहे.

३. सदर व्यवसाय अभ्यासक्रमासाठी राज्यभरातून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी मुल, कुही, नरखेड व गोंडपिंपरी येथील प्रत्येकी ०१ शिल्पनिदेशक अशाप्रकारे एकूण ०४ शिल्पनिदेशकांची पदे औद्योगिक प्रशिक्षण संस्थासाठी औंध-पुणे व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरहू पदावर नियुक्तीसाठी राज्यभरातून ०४ शिल्पनिदेशकांची निवड करण्यात यावी. सद्यस्थितीत Aeronautical Structure and Equipment Fitter हा व्यवसाय अभ्यासक्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे सुरू असून निवड करण्यात आलेल्या शिल्पनिदेशकांना सदर व्यवसायांचे प्रशिक्षण घेण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे प्रतिनियुक्त करण्यात यावे.

४. शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक व पुणे येथे Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमास डी.जी.टी. नवी दिल्ली यांचेकडून संलग्नता प्राप्त करुन घेण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी जसे मानकाप्रमाणे जागा, यंत्रसामुग्री इ. ची पूर्तता संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत करण्यात यावी.

५. उपरोक्तनुसार Aeronautical Structure and Equipment Fitter हा व्यवसाय औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक व पुणे येथे सुरु करण्यासाठी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी आवश्यक कार्यवाही करावी.

६. या प्रस्तावावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

"मागणी क्र. झेडए-२, २२३०-कामगार व सेवायोजन, ०३-प्रशिक्षण, (००३)-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२)- कारागिरांचे तांत्रिक व व्यवसाय प्रशिक्षण, (०२)(०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३०ए२०९)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२११५४८४८५००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGEETA AJIT SHINDE

Digitally signed by SANGEETA AJIT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ba607066e7a34e428b7c7c73de0f7e09a315a2af5075fd47f1e08389aa137b81, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DDF4C16E4A3043BBAA409E4ECF901CA0490CE93C66913DE88A7769927FF5E261, cn=SANGEETA AJIT SHINDE
Date: 2023.03.21 15:54:35 +05'30'

**(संगीता शिंदे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी
२. सचिव, मंत्रालय, मुंबई

३. प्रधान सचिव, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग ,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. सह सचिव/उप सचिव, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय नाशिक, पूणे, नागपूर
८. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, नाशिक, पूणे, नागपूर
९. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी नाशिक,पूणे, नागपूर
१०. प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक,पूणे, नागपूर
११. निवडनस्ती.

## प्रपत्र -१

### औद्योगिक प्रशिक्षण संस्था औंध-पुणे येथे नव्याने प्रस्तावित व्यवसाय अभ्यासक्रमांचा तपशिल

**रु. लाखात**

| **अ.क्र.** | **व्यवसाय** | **तुकडयांची संख्या** | **प्रवेश क्षमता** | **यंत्रसामुग्री व हत्यारे एकूण खर्च (रु.लाखांत) (अंदाजित)** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | एरोनॉटिकल स्ट्रक्चर आणि इक्विपमेंट फिटर (Aeronautical Structure and Equipment Fitter ) | २ | ४० | १५०.०० |
| | **एकूण** | **२** | **४०** | **१५०.००** |

## प्रपत्र -२

### औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक येथे नव्याने प्रस्तावित व्यवसाय अभ्यासक्रमांचा तपशिल

**रु. लाखात**

| अ.क्र. | व्यवसाय | तुकडयांची संख्या | प्रवेश क्षमता | यंत्रसामुग्री व हत्यारे एकूण खर्च (रु.लाखांत) (अंदाजित) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | एरोनॉटिकल स्ट्रक्चर आणि इक्विपमेंट फिटर (Aeronautical Structure and Equipment Fitter ) | २ | ४० | १५०.०० |
| | **एकूण** | **२** | **४०** | **१५०.००** |

| प्रपत्र-३ | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे नाव** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **आवश्यक शिक्षकीय पदे** |
| १ | औ.प्र.संस्था, औंध- पुणे | शिल्प निदेशक | (i) एस-१४ : ३८६००-१२२८००<br>(ii) एस-१५ : ४१८००-१३२३०० (वरिष्ठ श्रेणी)<br>(iii) एस-१७ : ४७६००-१५११००(निवडश्रेणी २०% पदांकरिता) | ०२ |
| २ | औ.प्र.संस्था, नाशिक | शिल्प निदेशक | (i) एस-१४ : ३८६००-१२२८००<br>(ii) एस-१५ : ४१८००-१३२३०० (वरिष्ठ श्रेणी)<br>(iii) एस-१७ : ४७६००-१५११००(निवडश्रेणी २०% पदांकरिता) | ०२ |